**डेक्कन कॉलेज पदव्युत्तर व संशोधन संस्था, पुणे या संस्थेस पुरातत्व वस्तुसंग्रहालयाच्या नवीन इमारतीसाठी अनुदान उपलब्ध करुन देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

उच्च व तंत्रशिक्षण विभाग

शासन निर्णय क्रमांकः डीसीआय - २०११/(१४९/११)/विशि-२

मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.

दिनांक : १५ नोव्हेंबर, २०११.

<u>पहा</u> :- १) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्र. डिसीआय-२००७/(४०६/०७)/ विशि-१, दि. ४ फेब्रुवारी, २००८

२) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्र. डिसीआय-२००८/(५०/०८)/विशि-१, दि. १.१.२००९

३) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्र. डिसीआय-२००९/(१५५/०९)/विशि-२, दि. ३.३.२०१०

४) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्र. डिसीआय-२०१०/(४७/१०)/ विशि-२, दि. ९.८.२०१०

५) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्र. डिसीआय-२०१०/(४७/१०)/ विशि-२, दि. १८.२.२०११

६) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग क्र. डिसीआय-२०१०/(४७/१०)/ विशि-२, दि. १८.०३.२०११

७) शिक्षण संचालक,उच्च शिक्षण क्र. डीसीपी/२००९-१०/तरतूद/विशि-१/३६८५, दि. ०३.०९.२०११

<u>**प्रस्तावना**</u> : डेक्कन कॉलेज पदव्युत्तर व संशोधन संस्था, पुणे या संस्थेची सन १९३९ मध्ये स्थापना झालेली असून, संस्थेस अभिमत विद्यापीठाचा दर्जा देण्यात आलेला आहे. सदर संस्थेने आतापर्यंतच्या कालावधीत प्राचीन, मध्ययुगीन, मराठा-मुस्लीम कालखंड, अश्मयुगीन कालखंड, ताम्रपाषाण युगीन कालखंड, महापाषाणयुगीन कालखंड अशा विविध कालखंडाबाबत मूलभूत संशोधन, सर्वेक्षण, उत्खनन करुन भारताचे सांस्कृतिक व ऐतिहासिक महत्व जगासमोर मांडलेले आहे. या संशोधन व उत्खननातून संस्थेस वरील कालावधीतील मूर्ती, अभिलेख, अवजारे, हत्यारे, प्राण्यांचे जीवाश्म अशा अनेक वस्तू प्राप्त झालेल्या आहेत.

सद्यःस्थितीत विद्यार्थ्यांच्या शैक्षणिक वर्गाची जागा, या वस्तूंच्या संग्रहालयासाठी वापरण्यात येत आहे. त्यामुळे शैक्षणिक सहली संग्रहालयास भेट देण्यास येतात, तेव्हा विद्यार्थ्यांचे वर्ग आणि त्या सहली यांची सरमिसळ होऊन त्यांच्या विद्यार्थ्यांच्या शिक्षणावर परिणाम होतो. संस्थेस विकास कामासाठी व देखभाल दुरुस्तीसाठी राज्यशासनामार्फत रक्कम द्यावयाची आहे. त्यानुसार या संस्थेची पुराण वस्तुसंग्रहालयाची इमारत बांधण्यासाठी शासन निर्णय क्र. डिसीआय-२००७/(४०६/०७)/विशि-१, दि. ४ फेब्रुवारी, २००८ अन्वये रु. ३,५२,९६,७५०/- एवढया खर्चाच्या रक्कमेस प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे.

सदर संस्थेला सन २००८-२००९ ते २०१०-२०११ या कालावधीत संदर्भाधीन क्रमांक (२) ते (६) येथील शासन निर्णयान्वये आतापर्यंत रुपये २,०९,००,०००/- इतकी तरतूद वितरीत करण्यात आली आहे. सद्यःस्थितीत एकूण प्रशासकीय मान्यतेपैकी अद्याप रुपये १,४३,९६,७५०/- इतकी तरतूद उपलब्ध करुन देणे शक्य आहे. आता सदर संस्थेस मंजूर करण्यात आलेल्या एकूण अनुदानापैकी उर्वरित तरतूद वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u> :-** सन २०११-२०१२ या आर्थिक वर्षामध्ये प्रस्तावनामध्ये नमुद केलेल्या डेक्कन कॉलेज पदव्युत्तर व संशोधन संस्था, पुणे या संस्थेमध्ये पुराणवस्तूसंग्रहालय स्थापन करण्यासाठी सन २०११-२०१२ या आर्थिक वर्षामध्ये अर्थसंकल्पीत केलेल्या रुपये १००.०० लक्ष (रुपये शंभर लक्ष फक्त) इतक्या तरतूदीपैकी सदर संस्थेस रु. ५०.०० लक्ष (अक्षरी रु. पन्नास लक्ष फक्त) इतकी तरतूद सदर संस्थेस वितरित करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे. सदरहू मंजूर झालेली तरतुद खर्च करण्याची सर्वस्वी जबाबदारी संचालक (उच्च शिक्षण ) महाराष्ट्र राज्य, पुणे यांची राहील.

२. वरील अनुदानाची सर्व कागदपत्रे व हिशेब महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई किंवा प्रकरणपरत्वे महालेखापाल -२ नागपूर त्यांनी सदर कामाकरीता प्राधिकृत केलेले अधिकारी यांना तपासण्याचे अधिकार असून, त्यांनी मागणी केल्यास, सर्व कागदपत्रे त्यांच्याकडे तपासणी करीता विद्यापीठाने सादर केली पाहिजेत. विद्यापीठास ज्या उद्दिष्टासाठी मंजुर केलेल्या अनुदानाचा वापर त्याच उद्दिष्टासाठी करावा आणि त्याबाबतचे विनियोजन प्रमाणपत्र (Utilisation Certificate)संबंधितांना विहित वेळेत सादर करण्याची दक्षता घेण्यात यावी.

३. सदर खर्च " मागणी क्रमांक - डब्ल्यु-२ २२०२-सर्वसाधारण शिक्षण ०३, विद्यापीठीय व उच्च शिक्षण १०४, विद्यापीठांना सहाय्य, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना १०४, अशासकीय महाविद्यालयांना व संस्थांना सहाय्य- (०२) (०२) डेक्कन महाविद्यालय पुणे यांच्या विस्तारासाठी अनुदाने (२२०२ ०९१४), ३१ सहाय्यक अनुदान " या लेखाशिर्षाखाली खर्च घालण्यात यावा.

४. हा शासन निर्णय, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग पहिला उप विभाग तीन मधील अ.क्र. ४-नियम क्रमांक २७(२) (अ) नुसार प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारान्वये आणि वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र. अंदाज २०.११/प्र.क्र.९३/२०११/अर्थसंकल्प-३, दिनांक २१.०९.२०११ अन्वये प्राप्त झालेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

५. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.govt.in या संकेत स्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०१११११४१४१२३४००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

( वि. मा. पाटील)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) मा. राज्यपाल तथा कुलपती यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हील, मुंबई,
२) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
३) सह संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
४) कुलगुरु, डेक्कन कॉलेज पदव्युत्तर व संशोधन संस्था, पुणे
५) कुलसचिव, डेक्कन कॉलेज पदव्युत्तर व संशोधन संस्था, पुणे
६) सहसंचालक ( उच्च शिक्षण) पुणे विभाग, पुणे.
७) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता)-१/२ महाराष्ट्र, मुंबई / नागपूर
८) महालेखापाल, (लेखा परीक्षण) -१/२ महाराष्ट्र, मुंबई / नागपूर
९) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे,
१०) नियोजन विभाग, (का-१४७१) मंत्रालय, मुंबई.
११) वित्त विभाग,(व्यय-५) ( अर्थसंकल्प-३/८) मंत्रालय, मुंबई.
१२) सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३) मा. प्रधान सचिव,उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
१४) उप सचिव (विशि), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
१५) अवर सचिव (साशि-१), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई,
१६) निवड नस्ती (विशि-२), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.